**मौजे शिवनी, दाभा, वडगाव, आरंभी, चिरकुटा, फुलवाडी, रुई (मोठी) ता.दिग्रस जि. यवतमाळ येथील Causeway बंधाऱ्यासह नाला खोलीकरण व रुंदीकरणाचे काम या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नप्रमा-२०२४/प्र.क्र-१०४/जल-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक: १३ मार्च, २०२४.**

**वाचा**:

१. मृद व जलसंधारण विभाग शासन निर्णय सिबांका-२०२२/ प्र.क्र. २१२/जल १, दि. १७.०४.२०२३
२. अपर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपुर यांचे क्र.प्रशा-२/२६६/यवतमाळ विभाग/ अंदाजपत्रक/ अमरावती मंडळ/२०२३, दि. ०५.०२.२०२४

**प्रस्तावना-**

मौजे शिवनी, दाभा, वडगाव, आरंभी, चिरकुटा, फुलवाडी, रुई (मोठी) ता.दिग्रस जि. यवतमाळ येथील Causeway बंधाऱ्यासह नाला खोलीकरण व रुंदीकरणाचे काम प्रस्तावीत आहे. सदर पाणलोट क्षेत्रामधील गावालगत व शिवारातून वाहत असलेल्या नदीला/ नाल्याला दरवर्षी मोठे पुर येत असल्यामुळे पुरात या नदीचा पसारा दोन्ही बाजुला होवून काठावरील शेतांचे तसेच नदीकाठावरील गावात पुराचे पाणी शिरुन नुकसान होत आहे. या नदीचा/नाल्याचा उतार अतिशय मंद स्वरुपाचा असल्यामुळे तसेच गाळ साचून नदीचा/ नाल्याचा काटछेद खुपच कमी झाला आहे. त्यामुळे या नदी/नाल्याची विसर्ग क्षमता कमी झाली आहे. अतिवृष्टीमुळे गावाचे व शेतीतील पिकाचे मोठे नुकसान होत असून काही भागात शेती खरडून गेल्याचे अहवाल आहेत. त्याचप्रमाणे द्वारयुक्त Cause way प्रस्तावीत करण्यात आले असुन जेणेकरुन पावसाळा संपल्यानंतर गेट टाकूण पाणी अडविणे शक्य होईल तसेच शेतकऱ्यांना नाल्याच्या एका काठावरून दुसऱ्या काठावर जाण्याकरिता Cause way चा उपयोग होईल. सदर खोलीकरणामुळे अस्तित्वातील बंधाऱ्याच्या पाणीसाठ्यात वाढ होवुन उपलब्ध होणाऱ्या पाणी साठ्यामुळे पुनर्भरणासाठी अतिरिक्त पाणीसाठा वाढीमुळे पुरसंरक्षणासोबतच जलसंधारणाचे उद्दिष्ट पुर्ण होण्यास मदत होईल. सदर कामे प्रायोगिक तत्वावर प्रस्तावित आहेत. या कामाची अंदाजित किंमत रु. ४,९५,३१,६७१/- येत असून सदर कामास प्रशासकीय मान्यता देणेचे शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

मौजे शिवनी, दाभा, वडगाव, आरंभी, चिरकुटा, फुलवाडी, रुई (मोठी) ता.दिग्रस जि. यवतमाळ येथील Causeway बंधाऱ्यासह नाला खोलीकरण व रुंदीकरणाचे काम या कामाची एकूण किंमत **रू. ४,९५,३१,६७१/- (अक्षरी रुपये चार कोटी पंच्याण्णव लक्ष एकतीस हजार सहाशे**

**एकाहत्तर फक्त)** किंमतीच्या प्रस्तावास खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. या योजनेच्या मूळ अंदाजपत्रकानुसार तरतूद सोबत "जोडपत्र अ" मध्ये सादर करण्यात येत आहे .

१) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत करण्यात यावा व नियोजित वेळेत काम पूर्ण करण्यात यावे.

२) सदरचे काम सुरु करणेपुर्वी सविस्तर सर्व्हेक्षण करुन खालील बाबींची पुर्तता तांत्रीक मान्यता देणाऱ्या सक्षम अधिकारी यांची मान्यता घ्यावी.

  २.१. नाल्याचा लंब छेद (L-Section) काढावा.

  २.२. नालाच्या प्रत्येक ५०० मी. अंतरावर नदी पात्राचा काटछेद संकल्पन करावे.

  २.३. नाला खोलीकरण करणेपुर्वी व संकल्पनानंतर १५ मी. C/C काटछेद काढावा.

  २.४. नाला खोलीकरण कामाचे खोदकामाचे दर वहन अंतरे ० ते १५ मी. व २५१ ते ५०० मी. असे घेण्यात आलेले आहेत. तरी संकल्पीत काटछेदानुसार नाल्यांच्या दोन्ही तीरावरील माती गाईडबंडासाठी किती साहित्य लागणार आहे याबाबत जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग यांनी खातरजमा करावी व त्यानुसार उपलब्ध साहित्याचा वापर करावा.

  २.५. नाला खोदकामाचे उर्वरित परिमाण कुठे व किती टाकले याबाबतचे अभिलेखे जतन करण्यात यावे.

३) सदरचे काम पूर्ण होईपर्यत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

४) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्वाचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

५) कामांचे Geotag व वेळेसह व्हिडीओ चित्रीकरण बंधनकारक राहील.

  a) काम सुरू करण्यापूर्वी

  b) २५% पूर्ण झाल्यानंतर.

  c) ५०% काम पूर्ण झाल्यानंतर.

  d) ७५% काम पूर्ण झाल्यानंतर.

  e) १००% काम पूर्ण झाल्यानंतर.

या कामात पाच टप्प्यात Geotag व्हिडीओ चित्रीकरण करण्यात यावे. प्रत्येक टप्प्याच्या व्हिडिओ चित्रीकरणाचा कालावधी किमान ३ मिनिटाचा आवश्यक राहील. काम सुरू करण्यापूर्वी एका बाजूने चित्रीकरण सुरुवात करून दुसऱ्या टोकापर्यंत संपूर्ण चित्रीकरण करण्यात यावे.

  अ) व्हिडीओ चित्रीकरण करताना प्रत्येक वेळेस कामाचे जलसंधारण अधिकारी व कंत्राटदार/ त्यांचा प्रशिक्षित तांत्रिक कर्मचारी यांची उपस्थिती अनिवार्य आहे. किमान दोन वेळेस खुद्द कंत्राटदाराची उपस्थिती आवश्यक आहे.

  ब) चित्रीकरणांमध्ये किमान दोन टप्प्यांमध्ये उप अभियंता व एका टप्प्यामध्ये कार्यकारी अभियंता यांची उपस्थिती अनिवार्य आहे.

  क) देयके पारित करताना मोजमाप पुस्तिका सोबत चित्रीकरणाचा Pendrive सादर करावा. तसे मोजमाप पुस्तिकेत नमूद करावे.

ड) सदर चित्रीकरणाची प्रत कार्यकारी अभियंता यांनी तपासावी व वरील सूचनांप्रमाणे चित्रीकरण नसल्यास देयक पारित करून होणार नाही.

इ) चित्रीकरणाची किमान १५ सेकंदांची संक्षिप्त प्रत विभागाच्या जिओपोर्टलवर Upload करण्यात यावी.

६) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.नागरी २०११/प्र.क्र.१९२/निधी जल-१ दिनांक ०२ फेब्रुवारी २०१२ अन्वये निर्धारित तरतुदींचे काटेकोर अनुपालन करण्यात यावे.

७) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नविन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

८) सदर कामाची अंमलबजावणी करतांना दर्जा व गुणवत्ता उत्कृष्ठ ठेवण्याची जबाबदारी संबंधीत क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील.

९) पाणीसाठा करण्याच्या दृष्टीने जिल्हा जलसंधारण अधिकारी व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी काम पुर्ण झाल्यावर प्रमाणित करणे आवश्यक राहील.

१०) शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/ सिं. व्य. (कामे) दि. ०१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचना नुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

११) प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय मंजूर किंमतीच्या मर्यादेत व नियोजनानुसार काम पुर्ण करण्यात यावे.

१२) प्रस्तावित व्दारयुक्त Cause way फ़क्त शिवरस्ता, पाणंद रस्ता, गाडी वाट या ठिकाणीय घेण्यात यावे.

१३) मृद व जलसंधारण विभागाचा शासन निर्णय सिबांका-२०२२/प्र.क्र. २१२/जल १, दि. ३१.०५.२०२२ मधील सुचनांचे अनुपालन करावे.

१४) सदर नाला खोलीकरणाचे काम करण्यापुर्वी व काम झालेनंतर नाल्याचे काटछेद १५ मी. C/C करुन विभागात जतन करण्यात यावे.

२.०. या योजनेच्या कामावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रं.** ZH-५

**लेखाशिर्ष ४४०२ २७९९**

**(०२)(०२) सिमेंट बंधारा**

**कार्यक्रम (कार्यक्रम)**

**५३, मोठी बांधकामे**

**४.०** प्रस्तुत आदेश प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१३१६११५३६१२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH
NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.03.13 16:21:28 +05'30'

**(प्र. नि. पाटील)**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव.
३) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, विधान मंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
४) सर्व मा. संसद सदस्य, विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. मंत्री ( मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
८) सर्व मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.
९) मा. सचिव ( मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक
१०) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) आयुक्त मृद व जलसंधारण, जल आयुक्तालय, छ. संभाजीनगर.
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छ. संभाजीनगर.
१३) अपर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपुर.
१४) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती.
१५) प्रादेशिक दक्षता गुणनियंत्रण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नागपुर.
१६) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, यवतमाळ.
१७) कार्यासन अधिकारी (जल-४), जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.
१८) निवडनस्ती (जल-१).

मृद व जलसंधारण विभाग

जोडपत्र 'अ'

मौजे शिवनी, दाभा, वडगाव, आरंभी, चिरकुटा, फुलवाडी, रुई (मोठी) ता.दिग्रस जि. यवतमाळ येथील Causeway बंधाऱ्यासह नाला खोलीकरण व रुंदीकरणाचे काम या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत..

शासन निर्णय क्रमांक: नप्रमा-२०२४/प्र.क्र-१०४/जल-१, दिनांक १३ मार्च, २०२४.

| अ.क्र. | उपशिर्ष | अंदाजपत्रकीय किंमत |
|---|---|---|
| १ | A-Preliminary | २०,००,०००.०० |
| २ | B- Land | ०.०० |
| ३ | C-Works | ३,४०,९७,८१४.०० |
| ४ | Construction of Causeway cum Bandhara | ८३,९३,६६९.०० |
| ५ | D- Regulator Inlet | १०,५२,७८२.०० |
| ६ | Pitching | ०.०० |
| ७ | K- building | ०.०० |
| | Total Cost | ४,५५,४४,२६५.०० |
| | Amount GST+ Royalty Charges | ५६,७०,२००.०० |
| | Centage Charges १०% (Excluding Royalty and GST) | ३९,८७,४०६.०० |
| | **एकुण** | **४,९५,३१,६७१.००** |

एकुण **रू. ४,९५,३१,६७१/- (अक्षरी रुपये चार कोटी पंच्याण्णव लक्ष एकतीस हजार सहाशे एकाहत्तर फक्त)**

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.03.13 16:21:46 +05'30'

(प्र. नि. पाटील)

कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव,

महाराष्ट्र शासन